**केंद्र शासन पुरस्कृत नोरॅड व स्टेपच्या**
**प्रस्तावांची छाननी करण्याकरीता**
**राज्यस्तरीय समितीची स्थापना**

२००४०७१९१३५९४३००१-२५ख

महाराष्ट्र शासन
महिला व बाल विकास विभाग,
शासन निर्णय क्र. संकीर्ण-२००१/प्र.क्र.३८३/का-२
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ७ जानेवारी, २००३.

**वाचा** :- दि. १० जानेवारी २००२ चा समक्रमांकाचा शासन निर्णय.

**निर्णय** :- केंद्र शासनाकडे **नोरॅड व स्टेप** या योजनांचे प्रस्ताव पाठविण्यापूर्वी प्रस्तावाची छाननी करण्यासाठी व शिफारस करण्यासाठी दि. १० जानेवारी २००२ च्या शासन निर्णयान्वये नियुक्त करण्यात आलेली समिती रद्द करण्यात येत असून वरील प्रस्तावांची छाननी व शिफारस करण्याकरीता सचिव ( महिला व बाल विकास विभाग ) महाराष्ट्र शासन यांच्या अध्यक्षतेखाली,खालील प्रमाणे समिती नियुक्त करण्यात येत आहे.

१) सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - अध्यक्ष.

२) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे किंवा त्यांचे प्रतिनिधी. - सदस्य.

३) व्यवस्थापकीय संचालक/ महाव्यवस्थापक, माविम मुंबई - सदस्य.

४) उप सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - सदस्य.

५) सचिव, महाराष्ट्र राज्य समाज कल्याण सल्लागार बोर्ड, मुंबई - सदस्य.

६) कक्ष अधिकारी (का-२) महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - सदस्य सचिव.

आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे , महिला आर्थिक विकास महामंडळ, मुंबई आणि महाराष्ट्र राज्य समाज कल्याण सल्लागार बोर्ड, मुंबई यांचेकडे विहित मार्गाने प्राप्त होणारे प्रस्ताव छाननी करुन महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई येथे पाठविण्यात यावेत. या प्रस्तावाची छाननी करुन हे प्रस्ताव समितीच्या शिफारशीसाठी समितीपुढे सादर करण्यात येतील. समितीने शिफारस केलेले प्रस्ताव ~~प्रमाणपत्रासह~~ केंद्र शासनाकडे पाठविण्यात येतील. ज्या प्रस्तावामध्ये त्रुटी राहिलेल्या आहेत ते प्रस्ताव संबंधित